वितरण आदेश क्र. ८

**राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मंजूर तरतूदीमधून "प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती ) खोपोली, रायगड" या विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेस प्रशिक्षण हॉलसाठी फर्निचर व प्रशिक्षण साहित्य खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणे. सहायक अनुदान मंजूर करणेबाबत.**
**सन २०१६-२०१७ (योजनांतर्गत )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : यशदा २०१६/८३६/प्रक्र.१५०/१२-अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ७ नोव्हेंबर,२०१६

**संदर्भ :-**
१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.टीआरएन-२००९ /प्रक्र.३९/२००९/१२-अ, दि.२३ सप्टेंबर,२०११
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.टीआरएन-२०११ /प्रक्र.२८७/२०११/१२-अ, दि.१४ ऑक्टोबर,२०१३
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८०/अर्थसंकल्प,३ दि.१ एप्रिल, २०१६.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/ प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि.६ एप्रिल, २०१६
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प,३ दि. २० एप्रिल, २०१६.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र .- बीयुडी२०१६-/ प्र.क्र ५२./२०१६/२५, दि.२ २ एप्रिल, २०१६
७. विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष विभागीय प्रशिक्षण संस्था, रामेती खोपोली यांचे क्र. रामेतीखो/राप्रधो/भांडार / फव प्रसा/७७१/२०१६/खोपोली, दि.१७.१०.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण मंत्रीमंडळाच्या मान्यतेने दि.२३.९.२०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणातील तरतुदीनुसार दि.१४.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ६ प्रशिक्षण संस्थांना विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणुन घोषित करण्यात आले आहे. **"प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती ) खोपोली, रायगड"** या संस्थेत राज्य प्रशिक्षण घोरण २०११ अन्वये विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित झाल्यानुसार कोकण विभागातील वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी / कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे, जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थां म्हणूनही वर्ग-४ च्या कर्मचा-यांकरिता या संस्थेत प्रशिक्षण कार्यक्रम राबविले जातात. याकरिता, सदर संस्थेत, संस्थेच्या संगणक हॉलच्या वर नवीन प्रशिक्षण हॉल बांधण्यात आलेला असून या हॉलकरिता फर्निचर व प्रशिक्षण साहित्याची आवश्यकता लक्षात घेऊन, त्याची मागणी येरवडा पुणे, यांच्याकडे नोंदवून त्याचे दरपत्रक संस्थेने प्राप्त करून घेतलक आहे. या दरपत्रकानुसार सदर फर्निचर खरेदीकरिता रु.९,७८,४००/- इतका निधी उपलब्ध करून देण्याबाबत सदर पत्रान्वये त्यांनी कळविले आहे. त्यानुसार खरेदी करावयाचे फर्निचर, त्याची संख्या व दर याबाबतची माहिती खालील तक्त्यात दिल्याप्रमाणे आहे.

| अ.क्र. | खरेदी करावयाच्या बाबी | आकार | संख्या | दर रुपये | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|---|
| १ | साग स्टुल | २४ x१५ x १५ | १ | ३०००/- | ३०००/- |
| २ | साग स्टुल | २४ x१५ x १५ | १ | २५००/- | २५००/- |
| ३ | साग चावी बोर्ड | २४ x१५ x १५ | १ | २५००/- | २५००/- |
| ४ | साग बाकडे | २४ x१५ x १५ | २ | ६०००/- | १२,०००/- |
| ५ | लोखंडी बंक बेड | | १० | ११,५००/- | १,१५,०००/- |
| ६ | साग रॅक पटटीची | २४ x१५ x १५ | ६ | ७०००/- | ४२,०००/- |
| ७ | साग सनटॉप साईड कपाट ३ कप्पे | २४ x१५ x १५ | ३ | २६००/- | ७८००/- |
| ८ | संपूर्ण लोखंडी बाक पाठीसह | २४ x१५ x १५ | ६ | ६०००/- | ३६,०००/- |
| ९ | साग टेबल विना ड्रावर १ कपाट | २४ x१५ x १५ | २५ | १२,५००/- | ३,१२,५००/- |
| १० | साग रिव्हॉल्वींग चेअर हायबॅक | | ७ | १९,५००/- | १,३६,५००/- |
| ११ | साग के टाईप चेअर | | ५ | १२,०००/- | ६०,०००/- |
| १२ | साग टेबल १ ड्रावर | | ५० | ४०००/- | २,००,०००/- |
| १३ | साग वुडन डायस | | ३ | ४२००/- | १२,६००/ |
| १४ | साग संगणक टेबल | | १ | ७५००/- | ७५००/- |
| १५ | | | ३ | ९५००/- | २८,५००/- |
| | | | | **एकूण रुपये** | **९,७८,४००/-** |

वरील तक्त्यातील कामांसाठी येणाऱ्या खर्चासाठी सहायक अनुदान मंजूर करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

राज्य प्रशिक्षण धोरणाच्या अंमलबजावणीसाठी मागणी क्र. ए-०४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ००-१०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान योजनांतर्गत, या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता दि. ६ एप्रिल, २०१६ च्या शासन परिपत्रकान्वये, एकूण रु.२५६३.८० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये करण्यात आली असून वित्त विभागाच्या दि.२०.४.२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ८०% च्या मर्यादेत प्रथम नऊ महिन्याकरिता (डिसेंबर २०१६ अखेर) रु.२०५१.०० लाख इतका निधी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. त्यास अधिन राहून सामान्य प्रशासन विभाग, अर्थसंकल्प शाखा यांनी त्यांच्या दि. २२.४.२०१६ च्या परिपत्रकानुसार रु.२०५१.०० लाख इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिला होता. या अनुदानाच्या मर्यादेत यशदा पुणे, ६ विभागीय संस्था व ३६ जिल्हास्तरीय संस्थांमध्ये घेण्यात येणा-या प्रशासकीय प्रशिक्षण करिता प्रशिक्षण शुल्काच्या खर्चापोटी रु. २१५७.६० लाख - (रुपये एकवीस कोटी, सत्तावन्न लाख, साठ हजार फक्त) इतक्या खर्चास

दि.१९.९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय मान्यता देण्यात येऊन रु.११७५.०० लाख इतका निधी वितरित करण्यात आला आहे. आता, सदर लेखाशिर्षाखाली रु.८७६.०० लाख इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरित करण्याकरिता शिल्लक आहे.

**शासन निर्णय :-**

**"प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) खोपोली, रायगड"** या संस्थेच्या वरील प्रस्तावनेतील तक्त्यात नमूद केल्यानुसार येरवडा कारागृह, पुणे यांच्याकडून **रु. ९,७८,४००/- ( रु. नऊ लाख, अठठयाहत्तर हजार, चारशे फक्त )** इतक्या रकमेच्या फर्निचर खरेदीच्या प्रस्तावास उ.ऊ. व का.वि यांच्या दि.३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयानुसार, कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका यामधील प्रक्ररण क्र. २ मधील नियम क्र.२.९.२ व प्रक्ररण क्र. ५, नियम क्र.५.१२ नुसार व वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिता, उपविभाग दोन, अनुक्र.७, नियम क्र.९० नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र. ६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. आता, "प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) खोपोली, रायगड या संस्थेस प्रशासकीय मान्यता प्राप्त अनुदानानुसार विहित नियमाअन्वये फर्निचर व प्रशिक्षण साहित्य खरेदी करण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर योजनांतर्गत खर्चासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानापैकी **रु. ९,७८,४००/- ( रु. नऊ लाख, अठठयाहत्तर हजार, चारशे फक्त )** एवढे योजनांतर्गत सहायक अनुदान मंजूर करण्यात येत आहे .

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. ए-०४ २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ००-१०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातुन काढुन घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१६-२०१७ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प,३ दि. २० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

७. संस्थेने, आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र ( UTILIZATION CERTIFICATE ) महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

८. उपरोक्त अनुदानातुन केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र १, मुंबई यांना राहतील आणि त्याकरीता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१६११०७१५३६१४७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2016.11.07 15:39:44 +05'30'

**( अजित सो.देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष विभागीय प्रशिक्षण संस्था, रामेती खोपोली, रायगड.
३. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मुल्यमापन यंत्रणा, यशदा, बाणेर रोड,पुणे,
४. संचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मुल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
५. संचालक, "प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती ) खोपोली, रायगड.
६. जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, पुणे
७. विभागीय कृषी अधिकारी, पुणे.
८. उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१०. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३) / वित्त विभाग ( व्यय-४/ अर्थसंकल्प-१४) मंत्रालय, मुंबई -३२
११. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन -२५
१२. प्रधान सचिव (सेवा), यांचे स्वीय सहाय्यक सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. अपर मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. प्रधान सचिव, यांचे स्वीय सहाय्यक वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५,
१६. निवड नस्ती.